नियत वयोमान सेवानिवृत्त होताना शासकीय कर्मचा-यांच्या खाती शिल्लक असलेल्या अर्धवेतनी रजेचे रोखीकरण.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: अरजा-2493/57/सेवा-9,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 7 मे, 1994.

## शासन निर्णय

शासनाने असा निर्णय घेतला आहे की, नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होणा-या शासकीय कर्मचा-याला, सेवानिवृत्तिच्या दिनांकाला त्याच्या खाती शिल्लक असणा-या संपूर्ण अर्धवेतनी रजेचे रोख सममूल्य, खालील अटींवर, मंजूर करण्यात यावे.

(1) रोख सममूल्याच्या रकमेमधून सेवानिवृत्तिवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभांचे निवृत्तिवेतन सममूल्य वजा करण्यात येईल.

(2) रोख सममूल्य हे अर्धवेतनी रजेच्या बाबतीत अनुज्ञेय असलेल्या रजा वेतनाइतके असेल आणि शासकीय कर्मचारी ज्या तारखेस सेवानिवृत्त होईल त्या तारखेस अंमलात असलेल्या दराने महागाई भत्ता, देय असला तर, तो अर्जित रजेसह रजेच्या पहिल्या 240 दिवसांच्या रजा वेतनावर मिळेल.
300

(3) अर्धवेतनी रजेच्या रोख सममूल्याची परिगणना खालीलप्रमाणे करण्यात येईल.

अर्धवेतनी रजेचे रोख सममूल्य = (अर्धवेतनी रजा वेतन + अनुज्ञेय असल्यास त्यावरील महागाई भत्ता वजा निवृत्तिवेतन आणि इतर सेवानिवृत्ती लाभाचे निवृत्तिवेतन सममूल्य आणि अर्धवेतनी रजा वेतनावर महागाई भत्ता अनुज्ञेय असल्यास, निवृत्तिवेतनापरील वाढ) / 30 × नियत वयमान सेवानिवृत्तिच्या तारखेस देय असलेल्या अर्धवेतनी रजेचे दिवस.

(4) अर्धवेतनी रजेचे रोख सममूल्य वरीलप्रमाणे परिगणित करण्यात यावे व ते अर्जित रजेच्या रोख सममूल्या-बरोबर देण्यात यावे.

(5) वरीलप्रमाणे परिगणित करुन करण्यात आलेली रक्कम एकाचवेळी एका ठोक रकमेत देण्यात यावी.

(6) अर्धवेतनी रजा वेतन हे निवृत्तिवेतन व इतर निवृत्तिविषयक लाभांच्या रकमेहून कमी असेल तर अर्धवेतनी रजेचे रोख सममूल्य दिले जाणार नाही.

3. वरील आदेश दिनांक 1 एप्रिल 1993 पासून अंमलात येतील.

4. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, 1981 मधील या संबंधीच्या विद्यमान तरतुदींमध्ये या शासन निर्णयाच्या तरतुदी पुरती सुधारणा करण्यात आली आहे असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमांत यथावकाश रितसर सुधारणा करण्यात येईल.

5. या शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. स. वसनाक,
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर, (40 प्रती),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (40 प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (5 प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल 5 प्रती),
निवड नस्ती, कार्यासन सेवा-७.

---

* पत्राने.

एच-501 (12,000+10-5-94)-13.